<u>केंद्र पुरस्कृत योजना २०१५-१६</u>

**ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प व पेंच व्याघ्र प्रकल्पाकरिता सन २०१५-१६ साठी निधी वितरीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी- ०४.१५/प्र.क्र.१११ /फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख:- ०३ जुलै, २०१५.

**<u>वाचा</u>**

१) केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालय यांचे पत्र क्र. ४-१(११)/२०१५-पीटी, दिनांक १०.०६.२०१५.

२) केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालय यांचे पत्र क्र. ४-१(२७)/२०१५-पीटी, दिनांक २२.०६.२०१५.

३) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक:- १७.०४.२०१५.

**शासन निर्णय**

सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना-व्याघ्र प्रकल्प अंतर्गत ताडोबा-अंधारी व्याघ प्रकल्प व पेंच व्याघ्र प्रकल्पाचे विकास व संरक्षणाकरिता अनुक्रमे रु.३९३.४४४४५ लक्ष व रु. ३६४.३१३४ लक्ष वितरीत केले आहेत.

संदर्भ क्रमांक ३ च्या वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार ७०% निधी वितरीत करण्याचे अधिकार विभागास प्रदान करण्यात आले आहे.

केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीपैकी ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर व पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर यांचे विशेष व्याघ्र दलाच्या वेतनासाठी आवश्यक असलेला अनुक्रमे रु. १४०.०० लक्ष व रु. १४०.०० लक्ष निधी वित्त विभागाच्या परिपत्रकास अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करण्यास खालील अटीवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

- प्रस्तावीत खर्चापैकी अ) अनावर्ती खर्च -१०० % केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत विकासात्मक कामांसाठीचा खर्च लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०४) वन्यजीव व्यवस्थापन आणि संरक्षण (१०० % केंद्रीय अनुदान) (२४०६ १२४३) अनावर्ती खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून आणि सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खर्च करण्यात यावा.
- वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या

मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाचे क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक:- १७.०४.२०१५ च्या परिपत्रकास अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०३१७३९५४५२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.07.04 11:08:40 +05'30'

(अरविंद आपटे)
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**सोबत:**- वरीलप्रमाणे.

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
६. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
७. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर
८. कक्ष अधिकारी, (व्यय-१०), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

---

शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०४.१५/प्र.क्र.१११ /फ-१, तारीख:- ०३ जुलै, २०१५ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष उपशिर्ष २४०६-१२४३ | जुलै, २०१५ | ऑगस्ट, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | ०२- वेतन | १४० | १४० | २८० |
| एकूण | | १४० | १४० | २८० |

**********